महानगरपालिका / नगरपालिकांमध्ये राबविण्यात येणाऱ्या महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत अग्निशमन वाहनाची खरेदी व बांधणीबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक-अशसे-२०२३/प्र.क्र. ८९/नवि-०४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २४ जुलै, २०२४.

संदर्भ :-

१) नगर विकास विभाग, शासन निर्णय, क्र. अशस-१४०७/प्र.क्र.२११/नवि-२०, दि.३१ ऑगस्ट,२००९.
२) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२७/नवि-२०, दिनांक १२ ऑगस्ट,२०१६.
३) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०१९/प्र.क्र.६१/नवि-०४, दिनांक १२ मार्च,२०२१.
४) शासन निर्णय,नगर विकास विभाग क्र.अशसे-२०२३/प्र.क्र.८९/नवि-०४, दिनांक ०१ डिसेंबर,२०२३.
५) संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय यांचे पत्र क्र.मअसे-२०२३/३२/११९, दि.२७ जुलै, २०२३.

प्रस्तावना :-

राज्यातील ड-वर्ग महानगरपालिका/नगरपरिषदा तसेच नगरपंचायती यांच्या अग्निशमन सेवेतील तूट भरून काढण्याकरिता व राज्यातील अग्निशमन सेवेचे सक्षमीकरण करण्याकरिता विविध आवश्यक उपाययोजना करण्याच्या दृष्टीने दि.३१.०८.२००९ रोजी महाराष्ट्र अग्निसुरक्षा अग्निसुरक्षा अभियान राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये नव्याने स्थापन झालेल्या ड-वर्ग महानगरपालिका,नगरपरिषदा व नगरपंचायती यांचा समावेश महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानात करण्यात आला आहे. संदर्भ क्र. ३ व ४ अन्वये नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या दर्जानिहाय अग्नीशमन केंद्र व अग्नीशमन वाहन यांचा प्रकार, खर्चाची मर्यादा व शासन / नागरी स्थानिक स्वराज्य संस्थां यांचा हिस्सा निश्चित करण्यात आला आहे.

प्रस्तुत योजनेंतर्गत अग्निशमन केंद्राबाबत सार्वजनिक बांधकाम विभाग / महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व अग्निशमन वाहनाबाबत महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांच्या तांत्रिक मान्यतेनंतर प्रशासकीय मान्यता / शासन अनुदान बाबतचा प्रस्ताव संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था अग्निशमन सेवा संचालनालयामार्फत शासनास सादर करण्यात येतो. त्यासंदर्भात प्रशासकीय मान्यता देऊन व शासन हिश्याचा निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना उपलब्ध करण्यासाठी संचालनालयाकडे सपूर्द करण्यात येतो. त्यानंतर बांधणी, खरेदी, निविदा प्रक्रिया इ. कार्यवाही संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्यामार्फत करण्यात येते.

अग्निशमन केंद्र व वाहनाच्या तांत्रिक मान्यतेनुसारच त्यांची बांधणी / खरेदी इ. करणे तसेच खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, संचालनालय / शासनास विहित कालावधीत सादर करणे आवश्यक आहे. अग्निशमन वाहन हे मुनष्य व वित्त हानी कमी करणारे साधन असल्याने त्यांची तांत्रिक मान्यता व प्रत्यक्ष खरेदी / बांधणीमध्ये भिन्नता असता कामा नये. तथापि, अग्निशमन वाहनाची खरेदी / बांधणी या बाबी तांत्रिक मान्यतेनुसार होत नसल्याची तसेच त्यामध्ये एकसुत्रता नसल्याची बाब महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाने शासनाच्या निदर्शनास आणली आहे. तसेच अग्निशमन वाहनाची खरेदी, चेसीसवर बॉडी बिल्डींग व उपकरणे खरेदी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर होत असल्याने एकाच प्रकारच्या वाहनाचे खरेदी दर भिन्न असल्याचे निदर्शनास आले आहे. त्याचप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत प्राप्त होत नसल्याने त्याबाबत लेखा आक्षेप उपस्थिती होत आहेत. प्रस्तुत विषयाच्या अनुषंगाने संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांनी संदर्भ क्र.३ अन्वये अग्निशमन वाहनाची खरेदी, चेसीसवर बॉडी बिल्डींग व उपकरणे खरेदीच्या कार्यपध्दतीमध्ये सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे, त्याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानाअंतर्गत अग्निशमन वाहनाच्या बाबतीत पुढीलप्रमाणे सुधारित कार्यपध्दतीस मान्यता देण्यात येत आहे.

अ) शासनस्तरावरील प्रशासकीय मान्यतेनंतर अग्निशमन वाहनाची खरेदी, चेसीसवर बॉडी बिल्डींग व उपकरणाची खरेदी यापुढे महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांच्या स्तरावर एकत्रितपणे करण्यात यावी.

आ) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांचा हिस्सा महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाकडे जमा करावा.

इ) परिपूर्ण अग्निशमन वाहन महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाने संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेला सपूर्द करावे.

ई) सदर वाहनाची भविष्यातील दुरुस्तीची कामे / खर्च ई. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर करण्यात यावी.

उ) अग्निशमन वाहनाची खरेदी / बांधणी संचालनालयाच्या स्तरावर होणार असल्याने त्याबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र विहिती कालावधीत महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची जाबाबदारी संचालनालयाची राहील.

ऊ) खरेदी / बांधणी संचालनालनालयाकडून केंद्रीयस्तरावर होणार असल्याने खरेदीदर कमी राहतील तसेच शासनाच्या खर्चात बचत होईल या दृष्टीने संचालनालयाने नियोजन करावे.

२. अग्निशमन वाहनाची खरेदी, चेसीसवर बॉडी बिल्डींग व उपकरणे खरेदी बाबतचा निविदा मसूदा महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाने तयार करावा व त्यांनी त्यास पुढीलप्रमाणे महाराष्ट्र

अग्निशमन सेवा संचालनालय स्तरावर पुढीलप्रमाणे गठीत निविदा समितीची मंजूरी घेऊन त्यास राज्यस्तरीय समितीची मान्यता घ्यावी.

| अ.क्र. | अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई. | अध्यक्ष |
| २ | मुख्य अग्निशमन अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ | सदस्य |
| ३ | मुख्य अग्निशमन अधिकारी, बृहन्मुंबई व ठाणे महानगरपालिका | सदस्य |
| ४ | सह आयुक्त, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई. (संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय यांच्याकडून नामनिर्देशित) | सदस्य |
| ५ | सहायक आयुक्त (लेखा), नगरपरिषद प्रशासन संचालनालय | सदस्य |
| ६ | संचालक ,महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

३. महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियान अंतर्गत राज्यस्तरीय समिती पुढीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकारी | पदनाम |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (नवि-०२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. | अध्यक्ष |
| २ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (वित्त) , वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (मदत व पुनर्वसन) , महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५ | आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई. | सदस्य |
| ६ | सह सचिव / उप सचिव (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई. | सदस्य |
| ७ | संचालक ,महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, मुंबई | सदस्य सचिव |

४. राज्य शासनाकडून महाराष्ट्र अग्निसुरक्षा अभियानांतर्गत मंजूर अग्निशमन वाहनाची खरेदी, चेसीसवर बॉडी बिल्डींग व उपकरणे खरेदीचा निविदा मसुदा प्रस्ताव महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाने विहित कार्यपध्दतीनुसार तयार करावा. सदर निविदा मसुदा प्रस्ताव या अभियानांतर्गत या शासन निर्णयान्वये आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, नवी मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली गठीत समितीसमोर सादर करावा व समितीच्या शिफारशीने सदर प्रस्ताव या अभियानांतर्गत गठीत राज्यस्तरीय समितीसमोर सादर करावा. सदर समितीच्या मान्यतेनेनंतर सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने विहित कार्यपध्दतीनुसार निविदा प्रक्रिया राबवावी.

सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने निविदा प्रक्रिया पार पडल्यानंतर महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालयाने प्राप्त निविदांचे मुल्यांकन करुन प्राप्त निविदाधारकास या अभियानांतर्गत या शासन निर्णयान्वये अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव , नवि-०२ यांच्या अध्यक्षतेखाली गठीत राज्यस्तरीय समितीसमोर सादर करावेत. समितीच्या शिफारशीने व तदनंतर शासन मान्यतेने कार्यादेश निर्गमित करावेत.

५. अग्निशमन केंद्राबाबतची कार्यवाही पूर्वीप्रमाणेच संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावर करण्यात येईल. तसेच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत महालेखापाल / संचालनालयास सादर करावीत.

६. यापूर्वी वितरीत निधीचे प्रलंबित उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी विनाविलंब अग्निशमन सेवा संचालनायास सादर करुन संचालनालयाने सदर प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास सादर करावे व उपस्थित लेखा आक्षेप तात्काळ निकाली काढावेत.

७. संदर्भांकित क्र.१ ते ४ येथील इतर अटी व शर्ती कायम राहतील.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७२४१६५१३३०२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHRIKANT CHANDRAKANT ANDGE

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2024.07.25 12:59:55 +05'30'

**(श्रीकांत आडंगे)**
**उप सचिव,नगर विकास विभाग**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.

३. विभागीय आयुक्त, सर्व.
४. जिल्हाधिकारी, सर्व.
५. आयुक्त,सर्व महानगरपालिका,
६. संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय.
७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई,
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर,
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व
१३. जिल्हा प्रशासन अधिकारी, सर्व
१४. मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद/नगरपंचायती
१५. वित्त विभाग,व्यय-३/ कोषा प्रशासन-५/अर्थसं-१६/नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई.
१६. निवड नस्ती (नवि-०४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.